डिसेंबर २००० मध्ये नागपूर येथे झालेल्या " बंदी रजनी " कार्यक्रमामध्ये जाहीर केल्याप्रमाणे कारागृह खात्याच्या " बंदी कल्याण निधीस " निधी उपलब्ध करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक-एमआयएस-०१२१/१(१)/पीआरएस-२.
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- २९ जानेवारी, २००३.

वाचा:-१)कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र.बंदी रजनी /२०००/कक्ष,२ दिनाक १५ सप्टेंबर २००१ चे पत्र.

**शासन निर्णय :-** नागपूर येथे हिवाळी अधिवेशनाच्या दरम्यान दिनांक ४.१२.२००० रोजी " बंदी रजनी " हा कार्यक्रम तुरुंगातील कैद्याकडून सादर करण्यात आला होता. सदर कार्यक्रम पाहून बंदीवासातील बंदीजनांच्या अंगभूत कलांना उत्तेजन मिळावे म्हणून मा. उपमुख्यमंत्री यांनी रु. ५,०००,००/- (रुपये पाच लाख फक्त) कारागृह खात्याच्या " बंदी कल्याण निधीस" देण्याबाबतची घोषणा केली होती. त्यानुसार कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य पुणे यांनी त्यांच्या उपरोक्त पत्रान्वये सदरची रक्कम मंजूर करून ती पाठविणेबाबत विनंती केलेली होती.

२. कारागृह महानिरीक्षक पुणे यांनी केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने सदर बाब शासनाच्या काही काळ विचाराधीन होती. यासंदर्भात सदर रक्कम रु. ५,००,०००/-(रुपये पाच लाख फक्त ) पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध करून देण्याबाबत वित्त विभागाकडे विभागाने प्रस्ताव पाठविला होता. तथापि सदर प्रस्ताव मंजूरीसाठी विधीमंडळासमोर न आल्याने याबाबतचा निधी /खर्च प्राधिकृत करण्यास वित्त विभागाने परवानगी दिलेली असून सदर तरतूद विभागाने सुधारित अंदाजात समाविष्ट करण्यास कळविले आहे. त्यानुसार शासन या आदेशाद्वारे कारागृह खात्याच्या " बंदी कल्याण निधीस " रु. ५,००,०००/- (रुपये पाच लाख फक्त ) एवढा निधी प्राधिकृत करून खर्च करण्यास मंजूरी देत आहे. कारागृह महानिरीक्षक पुणे यांनी तेवढी तरतूद सुधारित अंदाज २००२-०३ मध्ये समाविष्ट करण्याची दक्षता घ्यावी.

३. यावर होणारा खर्च " २०५६ तुरुंग ,००१ संचालन प्रशासन (००)(०१) कारागृह महानिरीक्षणालय ४१, सहाय्यक अनुदाने या लेखाशीर्षाखाली सन २००२-२००३ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर १४२३/२००२/व्यय-८, दिनांक २६.१२.२००२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

(र. ना. माळी)
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन.

प्रति,
कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) पुणे
कारागृह उपमहानिरीक्षक (पूर्व विभाग) नागपूर.
महालेखापाल,-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर.
महालेखापाल,-१/२ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
कोषागार अधिकारी, पुणे.
कार्यासन (बीयुडी-२) गृह विभाग,मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
वित्त विभाग (व्यय-८) मंत्रालय,मुंबई.
निवडनस्ती.